मराठवाडा विभागातील सततच्या पाणी टंचाईवर मात करण्यासाठी औरंगाबाद व जालना या दोन जिल्ह्यात मराठवाडा ग्रीडची कामे करण्यास प्राप्त प्रशासकीय मान्यतेनुसार निधी वाटपाबाबत....
(लेखाशिर्ष-२२१५ ए०२३ )

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र.ग्रापापु-२०१९/प्र.क्र.१५०/पापु-१०**
जी. टी. हॉस्पिटल आवार, नवीन मंत्रालय,.
७ वा मजला, मुंबई-४०० ००१
तारीख: ०६ डिसेंबर,२०१९

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकःक्र.मवॉगी-२०१८/प्र.क्र.३९/पापु-१८,दिनांक २७.०३.२०१८
२) शासन निर्णय क्रमांकःक्र.मवॉग्री-२०१९/प्र.क्र.२८८/पापु-१८, दिनांक ०८.०३.२०१९
३) शासन निर्णय क्रमांकःक्र.मवॉग्री-२०१९/प्र.क्र.८९/पापु-१८, दिनांक २६.०८.२०१९
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र.मजीप्रा/ सस/ तांश-१/ ११०७ ,दि २४.१०.२०१९

<u>प्रस्तावना -</u>

मराठवाड्यातील जनतेस सततच्या कमी पर्जन्यनामुळे वारंवार पाणी टंचाईस तोंड द्यावे लागते. मराठवाडा विभागातील सततच्या पाणी टंचाईवर कायमस्वरूपी मात करण्याकरिता वॉटर ग्रीड करण्यासाठी इस्त्रायल सरकारच्या मे. मेकोरोट कंपनीसोबत दि. १८ जानेवारी , २०१८ रोजी सामंजस्य करार करण्यात आला आहे. त्यानंतर दि. २१ फेब्रुवारी, २०१८ रोजी सर्वंकष करार करण्यात आला आहे. या सर्वंकष करारानुसार कंपनीमार्फत मराठवाडयातील ग्रीडसाठी सहा अहवाल व प्रत्येक जिल्हयासाठी प्राथमिक संकल्पन अहवाल सादर करावयाचे आहेत. या अनुषंगाने दि. २४.०२.२०१९ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ

बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार मराठवाडा विभागासाठी प्रथमत: पिण्याच्या पाण्यासाठी ग्रीडची निर्मिती करणे व सदर कामाचे नियोजन, अंमलबजावणी, परिचालन व देखभाल दुरूस्ती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यास संदर्भाधीन क्र.२ येथील निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. तद्नुषंगाने सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी औरंगाबाद व जालना जिल्ह्यांसाठी मे. मेकोरोट यांनी सादर केलेल्या प्राथमिक संकल्पन अहवालास मान्यता देवून औरंगाबाद जिल्ह्यासाठी रू २७६४.४६ कोटी, जालना जिल्हयासाठी रू.१५२९.०१ कोटी असे एकूण रू. ४२९३.४७ कोटी इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता प्राप्त रू. ४२९३.४७ कोटी या रक्कमेमध्ये प्रत्यक्ष योजनेवर होणाऱ्या खर्चाव्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्चासाठी एकूण किंमतीच्या १ टक्के म्हणजेच रू. ४२.९३ कोटी इतकी तरतुद करण्यात आली. आहे. औरंगाबाद व जालना जिल्हयासाठी पॅकेज-१ या कामासाठी निविदा प्रसिध्द करण्यात आली असून औरंगाबाद व जालना जिल्हयासाठी पॅकेज-१ या कामासाठी आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी रू. ५.५५ कोटी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,बेलापूर यास वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

## शासननिर्णय-

मराठवाडा विभागासाठी ग्रीड पध्दतीच्या पाणी पुरवठा योजनेकरिता दुष्काळी परिस्थितीवर उपाययोजना करण्यासाठी इस्त्रायल देशाच्या मेकोरोट डेव्हलपमेंट ॲन्ड एन्टरप्रायजेस लि. (MEKOROT Development and Enterprises Ltd.) कंपनीसोबत केलेल्या करारानुसार सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना औरंगाबाद व जालना जिल्हयासाठी प्रत्यक्ष योजनेवर होणाऱ्या खर्चाव्यतिरिक्त इतर अनुषंगिक खर्चासाठी एकूण किंमतीच्या १ टक्क्यापैकी रू. ५.५५ कोटी अग्रीमाची रक्कम अदा करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास इतका निधी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी:**

१) सदर प्रशासकीय मान्यतेस प्रथम तांत्रिक मान्यता देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२) निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावा.

३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

४) सदर योजनेची अंमलबजावणी कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास प्रशासनाकडून जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु.५.५५/- (रुपये पाच कोटी पंचावन्न लाख फ़क्त)) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री.व.भि.माने) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त), (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री.व.भि.माने ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या योजनेवर होणारा खर्च सन २०१९-२० मध्ये मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषदांना सहाय्य, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०१) मराठवाडा एकात्मिक ग्रीड पध्दतीने पाणी पुरवठा योजनेसाठी सहायक अनुदान (२२१५ ए०२३)-३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ९ व क्र. ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०५१५२१०३२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2019.12.07 11:58:32 +05'30'

**(वसंत माने )**

अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१ मुंबई.
२. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -२ नागपूर.
३. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
७. जिल्हाधिकारी, औरंगाबाद/ जालना
८. उप सचिव तथा नियंत्रण अधिकारी, (रोख शाखा) पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था,(वासो) बेलापूर, नवी मुंबई.
१०. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण औरंगाबाद / जालना.
११. संचालक वित्त), तथा आहरण संवितरण अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
१२. उपसंचालक भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, औरंगाबाद/ जालना.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद/जालना
१४. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद/जालना

१५. प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.

१६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.

१७. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.

१८. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४४३) वित्त विभाग(व्यय-३) मंत्रालय मुंबई.

१९. कार्यासन (पापु-०४,०६,०७,१७,१८,१३, व २०) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.

२०. निवडनस्ती (पापु-१०)